**श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेला राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेअंतर्गत रा. स. वि.नि कर्ज, रा.स.वि.नि. भागभांडवल व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-१११२/प्र.क्र.१७६/९-स

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ३१ मार्च, २०१७

**वाचा:-**

१)शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः प्रक्रिया-११२००४/प्र.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.

२) रा.स.वि.नि. नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:३-२६/२०१२-FG/९९/SA२००२९, दिनांक ०७.०६.२०१२

३) शासन निर्णय क्र. प्रक्रिया-११२०१४/प्र.क्र.४६/९-स, दि.०१.०७.२०१४

४) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र दि.२४.१०.२०१६

५) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:-अर्थसं:-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.

**प्रस्तावना:-**

श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेमार्फत भात या पीकावर प्रक्रिया करण्याचा प्रकल्प उभारण्यात येत असून, राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या शेतमालाला योग्य भाव मिळावा म्हणून सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्याबाबत मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने या प्रकल्पाची वित्तीय सहाय्यासाठी राष्ट्रीय सहकारी विकास निगामाकडे शिफारस करण्यात आली होती. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने त्यांच्या दिनांक ७ जून, २०१२ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पाची किंमत रु.३२६.०० लाख ग्राहय धरुन खालील आकृतीबंधानुसार अर्थसहाय्य मंजूर केले आहे.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | टक्केवारी | आर्थिक आकृतीबंध |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासनाच्या हमीवर रा. स. वि. नि. किंवा इतर वित्तीय संस्थेकडून कर्ज | ६०% | १९५.६० |
| २ | रा.स.वि.नि. भागभांडवल | ३०% | ९७.८० |
| ३ | राज्य शासनाचे भागभांडवल | ०६% | १९.५६ |
| | एकूण:- | ९६% | ३१२.९६ |
| ४ | संस्थेचे स्वभागभांडवल | ०४% | १३.०४ |
| | **एकूण :-** | **१००%** | **३२६.००** |

वरील आकृतीबंधानुसार संस्थेने जमा करावयाची आपल्या हिश्याची रक्कम रु.१३.०४ लाख पूर्णपणे जमा केली आहे. श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेमार्फत भात प्रक्रिया प्रकल्पाच्या रु.३२६.०० लाखाच्या प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने संदर्भाधिन २ येथील पत्रान्वये अर्थसहाय्य मंजूर केलेले आहे.

संस्थेस वाचा मधील संदर्भ क्र.३ व्दारे शासन निर्णय दि.०१.०७.२०१४ अन्वये रा.स.वि.नि. कर्ज रु.३२.५७लाख, रा.स.वि.नि. भागभांडवल रु.२६.४९लाख, शासकीय भाग भांडवल (कोल्हे कमिटी-राज्य योजना) अंतर्गत रुपये ०९.७८लाख असे एकूण रु.६८.८४लाख इतके अर्थसहाय्य वितरीत करण्यात आलेले आहे. सद्यस्थिती संस्थेस एकूण रु.२४४.१२लाख इतके अर्थसहाय्य वितरीत करणे बाकी आहे. त्यानुसार या संस्थेस पुढील टप्पातील अर्थसहाय्य वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

या शासन निर्णयाव्दारे श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेस उपरोक्त आकृतीबंधात दर्शविण्यात आल्या नुसार रा.स.वि.नि. कर्जाच्या पुढील हप्त्यापोटी रु.११,६४,५००/- (रुपये अकरा लाख चौसष्ट हजार पाचशे फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल रु.१५,५२,७००/- (रुपये पंधरा लाख बावन्न हजार सातशे फक्त) आणि **शासकीय भागभांडवल** (कोल्हे कमिटी) रु.९,७८,०००/- (रुपये नऊ लाख अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

**०२.** कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि. ७ जून, २०१२ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे राहतील. राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांचे भागभांडवल व कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती सोबत जोडल्या आहेत. तसेच संस्थेस आतापर्यन्त मंजुर झालेल्या रक्कमेएवढया किंमतीच्या संस्थेची मालमंत्ता शासनाकडे तारण ठेवण्याबाबतचे कारारपत्रक संस्थेकडून करून घेणे आणि संस्थेच्या संचालकांकडून त्यांच्या वैयक्तीक मालमंत्तेचा बॉंड लिहुन घेणे बंधनकारक राहील.

**०३.** या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या उक्त रकमांचे आहरण करुन वरील परि.२ मधील अटींची पूर्तता करुन श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेला अर्थसहाय्य वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी " व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या स्वतंत्र लेखाशिर्षाखालील रकमा जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन रा.स.वि.नि. कर्ज रु.११,६४,५००/- (रुपये अकरा लाख चौसष्ट हजार पाचशे फक्त), रा.स.वि.नि. भागभांडवल रु.१५,५२,७००/- (रुपये पंधरा लाख बावन्न हजार सातशे फक्त) आणि **शासकीय भागभांडवल** (कोल्हे कमिटी) रु.९,७८,०००/- (रुपये नऊ लाख अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमांचे धनादेश

**"श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर"**

"SHRI PRAKASH AWADE SHETIMAL PRAKRIYA SAHKARI SANSTHA MARYADIT, MANGAON, TAL. HATKANANGLE, DISTRICT KOLHAPUR."

च्या नावाने वितरीत करण्यात यावा.

०४. श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर या संस्थेस शासनाच्या व निगमाच्या भागभांडवलाच्या/कर्जाच्या नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा / बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील.

०५. वरीलप्रमाणे मंजूर केलेला खर्च

**अ)** राष्ट्रीय सहकारी विकास निगमाचे कर्ज रु.११,६४,५००/- (रुपये अकरा लाख चौसष्ट हजार पाचशे फक्त) चा खर्च "मागणी क्र.व्ही-५, ६४२५- सहकारासाठी कर्जे , (००)(१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०२) सहकारी प्रक्रिया संस्था पंचवार्षिक योजनातंर्गत योजना, (०२) (०१) सहकारी शेती प्रक्रिया संस्थांना कर्जे (राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ) (६४२५ ०३१३) ५५ - कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ च्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

**ब)** राष्ट्रीय सहकारी विकास निगमाचे भाग-भांडवल रु.१५,५२,७००/- (रुपये पंधरा लाख बावन्न हजार सातशे फक्त) चा खर्च "मागणी क्र.व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०२) कृषि संस्करण संस्थेला (राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ) भाग भांडवली अंशदान (४४२५ ०२९४)-३२, अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**क) शासकीय भागभांडवल** (कोल्हे कमिटी) रु.९,७८,०००/- (रुपये नऊ लाख अठ्याहत्तर हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भाग भांडवली अंशदान (कोल्हे समिती) (राज्य योजना) (४४२५ ०७५९) ३२, अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०६. सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबीकरिता करीत आहे. याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर यांनी पणन संचालक, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यानंतर सादर करावा. जेणेकरुन निगमाकडून शासनास रक्कमेची प्रतिपूर्ती लवकरात लवकर होऊ शकेल. जर या कामी

संस्थेकडून कुचराई झाल्यास एकरकमी अर्थसहाय्याची रक्कम वसूल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. संस्थेचा प्रकल्प विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत संस्थेने योग्य ती काळजी घ्यावी.

**०७.** या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाचा कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी.

**०८.** राज्य शासनामार्फत संस्थेस दिल्या जाणाऱ्या भाग-भांडवलाची परतफेड योग्य प्रकारे होण्याचे दृष्टीने संबंधित संस्थेची मालमत्ता व संचालक मंडळाच्या प्रत्येक सदस्याची वैयक्तिक मालमत्ता संस्थेने शासनाकडे तारण ठेवणे बंधनकारक असून, त्याशिवाय संस्थेस मंजूर प्रकल्पांतर्गत अर्थसहाय्य वितरित करण्यात येऊ नये. या अटीची पूर्तता झाली किंवा नाही याची खात्री पणन संचालक यांनी केल्यानंतर निधी वितरित करण्यात यावा.

**०९.** महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत. यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय नियंत्रक अधिका-याची आहे. तसेच दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्ययावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिका-याची आहे. या संदर्भातील सूचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.

**१०.** हे आदेश वित्त विभागाचे वाचामधील क्रमांक ५ मध्ये उल्लेख केलेल्या शासन परिपत्रकाद्वारे प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**११.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११४२५४०८६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra S Pujari

Digitally signed by Mahendra S Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b5a303a1aac7ca1cc574b4617cc25b1634df3f64ec897959300a5d5688c1454, cn=Mahendra S Pujari
Date: 2017.03.31 14:34:13 +05'30'

**( महेंद्र पुजारी )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

०१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
०२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव सचिव
०३. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
०४. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
०५. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
०६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
०७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

०८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
०९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टीटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११० ०१६.
१४. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे. रोड, पुणे-१
१५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय, मुंबई
१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१९. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर
२०. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म. रा. पुणे-१
२१. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२. कक्ष अधिकारी (२१-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३. अध्यक्ष, "श्री. प्रकाश आवाडे शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्या. माणगांव, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर"
२४. निवडनस्ती (९-स).

# <u>शासकीय भाग-भांडवल परतफेडीबाबत अटी व शर्ती.</u>

1. सहकारी संस्थेस राज्य शासनास खाली नमूद केलेल्या मुदतीकरिता अग्रहक्काचे भाग (रिडिमेबल प्रिफरन्स शेअर्स) जारी करावे लागतील.
   a. मंजूर केलेल्या शासकीय भाग-भांडवलाचे ५०% भाग १० वर्षे मुदतीच्या अग्रहक्काचे (रिडिमेबल) राहतील.
   b. मंजूर केलेल्या शासकीय भाग-भांडवलाचे ५०% भाग १५ वर्षे मुदतीच्या अग्रहक्काचे (रिडिमेबल) राहतील.
2. सहकारी संस्था भाग-भांडवल परतफेड निधी निर्माण करील व त्यामध्ये दरवर्षी मंजूर केलेल्या भाग-भांडवलाच्या १/१५ इतकी रक्कम निव्वळ नफा काढणेपूर्वी सदर परतफेड निधीमध्ये जमा करतील.
3. सहकारी संस्थांना मिळलेल्या त्या भाग-भांडवलापैकी संपूर्ण भाग-भांडवल शासनास परत केल्याशिवाय सभासदांचे भाग-भांडवल परत करू शकणार नाही. मात्र जी सहकारी संस्था नंतर अवसायनात येईल, त्या संस्थेचे सभासदांचे भाग-भांडवल सहकार आयुक्त यांनी ठरवून दिलेल्या अटीनुसार परत करता येईल.
4. संस्थेने शासनाचे भाग-भांडवल पूर्णत: फेड होईपर्यंत ४% पेक्षा जास्त लाभांश जाहीर करु नये.
5. संस्थेने तिच्या सभासदांच्या मंजूरीतून ६ पैसे प्रती रुपयाप्रमाणे कपात करुन स्वत:चे भाग-भांडवल वाढवावे.
6. संस्थेने शासकीय भाग-भांडवल मिळाल्यापासून सहा महिन्यांच्या आत भाग-भांडवल प्रमाणपत्र "महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल" यांच्या नांवाने जाहीर करावे. अन्यथा शासनाचे संपूर्ण भाग-भांडवल एकरकमी वसूल करण्यात येईल.
7. सहकारी संस्थेने तिचा काढलेला भाग-भांडवल परतफेड निधी तिच्या नित्याच्या व्यवहारात वापरणार नाही. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी ठरवून दिलेल्या पध्दतीनुसार निरनिराळ्या वर्गाच्या सहकारी संस्थांस विहीत केलेल्या पध्दतीप्रमाणे गुंतवणूक करता येईल.
8. ज्या सहकारी संस्थेमध्ये कर्मचारी वर्गाची संख्या १० पेक्षा जास्त आहे, त्या संस्थेने त्यांच्याकडे असलेल्या एकूण जागांपैकी ३४% जागा मागासवर्गीयांसाठी राखून ठेवाव्यात. मागासवर्गीयांच्या एखाद्या गटासाठी राखून ठेवलेल्या रिकाम्या पदासाठी कोणतेही पद योग्य उमेदवाराच्या अभावी त्या गटातील उमेदवाराची नेमणूक करता आली नाही, तर ती ५ भरती वर्षापर्यंत त्या गटातील तशीच राखून ठेवावी. मात्र सेवाभरती करतांना कोणत्याही वेळी राखून ठेवावयाची पदे आणि तशीच चालू ठेवलेली मागील राखीव पदे या दोघांची मिळून होणारी संख्या ही अशा सेवाभरतीच्या वेळी रिकाम्या असलेल्या एकूण पदांच्या ५०% पेक्षा अधिक होवू नये. केवळ दोनच रिकामी पदे असल्यास त्यापैकी एक पद राखीव म्हणून समजण्यात यावे. परंतू जर एकच पद रिकामे असले तर ते बिनराखीव म्हणून समजण्यात यावे. ५०% पेक्षा अधिक होणारे आरक्षण पुढच्या सेवाभरतीच्या वेळेपर्यंत तसेच राखून ठेवण्यात यावे. मात्र ते ५ भरती वर्षापेक्षा अधिक काळ राखून ठेवली जावू नये.
   a. संस्थेने तिच्या एकूण सभासदांच्या १३% अनुसूचित जातीचे सभासद एक वर्षाचे आत करुन घ्यावेत.

9. शासनाने गुंतविलेल्या भागभांडवलावरील शासनास द्यावयाची लाभांशाची रक्कम असा लाभांश जाहिर केल्याच्या तारखेपासून तीन महिन्यांच्या आत शासकीय कोषागारात संस्थेने भरली पाहिजे व त्याबाबतची माहिती विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, यांना दिली पाहिजे. या अटींचा भंग केल्यास शासनाचे भाग-भांडवल त्या तारखेस एकरकमी परत घेतले जाईल व शर्तीचा भंग केल्याबद्दल संस्थेविरुध्द जरुर ती कारवाई केली जाईल.
10. संस्थेतील सचिव/व्यवस्थापक व ज्या कर्मचा-यांचे मूळ वेतन रु.३००/- वा त्यापेक्षा जास्त असेल अशा कर्मचाऱ्यांच्या नेमणूका सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे / पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या पूर्व संमतीस पात्र राहतील. संस्थेवर योग्य अशा मुख्य कार्यकारी अधिकारी नेमणूक करण्याचे अधिकार सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे / पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे राहतील.
11. शासनाने शासकीय भागभांडवलाकरिता वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तींची संस्थेने पूर्तता न केल्यास संस्थेला मिळालेले शासकीय भाग-भांडवल पूर्णतः किंवा अंशतः वसूल करण्याचे अधिकार शासन राखून ठेवत आहे.
12. संस्थेने आपल्या मालमत्तेचा आग विमा, विमा संचालनालय, महाराष्ट्र शासन यांच्या कार्यालयाकडूनच उतरविला पाहिजे.
13. शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्ती संस्थेला बंधनकारक राहतील.
14. लेखा परिक्षांची प्रमाणित केलेले वार्षिक आर्थिक पत्रके, संस्थेने प्रत्येक वर्षी महालेखाकार-२, नागपूर यांच्या कार्यालयास पाठवावे. त्याचप्रमाणे संस्थेला आर्थिक सहाय्य मंजूर झाल्याबरोबर तिच्या उपविधीची प्रतही पाठवावी.
15. संस्थेने तिची आर्थिक पत्रके महालेखाकार-२, नागपूर यांच्या तपासणीकरिता नेहमी तयार ठेवावीत.
16. संस्थेकडून शासनाने जर "मिटकॉन" प्रकल्प अहवाल सादर करणे आवश्यक ठरविल्यास तो द्यावा लागेल अन्यथा संपूर्ण रक्कम एकरकमी वसूलीस पात्र असतील.

*****

८/०९१८

## राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या कर्ज परतफेडीच्या अटी व शर्ती.

1. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून विहीत केलेल्या व्याज दरानुसार कर्जाच्या रकमेवर व्याज द्यावे लागेल.
2. विहीत मुदतीत प्रकल्प सुरु झाल्यास ०.५% इतकी व्याज दरात सूट मिळेल.
3. विहीत मुदतीत कर्जाची परतफेड केल्यास संस्थेस १% इतकी व्याज दरात सूट मिळेल.
4. कर्जाच्या मुद्दलाची विहीत मुदतीत संस्थेकडून परतफेड करण्यात आली नाही तर नेहमीच्या व्याज दराशिवाय २.५% इतके दंडनीय व्याज संस्थेकडून वसूल करण्यात येईल.
5. कर्ज परतफेडीचा कालावधी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या पत्रात नमूद केलेला आठ/दहा/बारा वर्षांचा असून या कालावधीपैकी उत्पादन सुरु झाल्यानंतरच एक वर्षाचा कालावधी Moratorium कालावधी गणण्यात येईल म्हणजेच संपूर्ण मुद्दलाची परतफेड संस्थेस उर्वरित सात/नऊ/अकरा समान हप्त्यात करावयाची आहे.
6. कर्जाच्या मुद्दलासाठी जरी एक वर्षाचा Moratorium कालावधी असला तरी व्याज अदा करण्यासाठी Moratorium कालावधी नसल्यामुळे उत्पादन सुरु होताच व्याजाचा भरणा शासकीय कोषागारात करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

*****